एप्रिल, २०२३ मध्ये राज्यातील विविध जिल्ह्यात अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपिके नुकसानीसाठी बाधितांना मदत देण्याबाबत (अवेळी पाऊस २०२३ आदेश क्र.३)...

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२३/प्र.क्र.७०/म-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १७ मे, २०२३.

**वाचा :**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.०३.२०२३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग समक्रमांक दि.१०.०४.२०२३ व दि.२१.०४.२०२३
४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.उपआ/नैआ/पुनर्व/म.स./कावि-१०९/२०२३, दि.२५.०४.२०२३
५) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.मशा/कार्या-६/नै.आ./१ ते ११ एप्रिल, २०२३ अ ब क ड/ कावि-०४/२०२३,दि.२७.०४.२०२३
६) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.मह-३/कावि ८०/ २०२३, दि.२८.०४.२०२३
७) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२३/मशाका/नै.आ./कावि-६३४, दि.१६.०५.२०२३

**प्रस्तावना:-**

अतिवृष्टी, पूर व चक्रीवादळ या सारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्यास पुढील हंगामामध्ये उपयोगी पडावे याकरिता शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान (Input subsidy) स्वरूपात एका हंगामात एक वेळेस याप्रमाणे राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून विहित दराने मदत देण्यात येते. तसेच, राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या इतर मान्य बाबींकरिता देखील विहित दराने मदत देण्यात येते. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७ मार्च, २०२३ अन्वये, राज्यात विविध नैसर्गिक आपत्तीमुळे झालेल्या नुकसानीकरिता मदत देण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे सुधारित दर व निकष दि.१ नोव्हेंबर, २०२२ पासून लागू करण्यात आलेले आहेत.

२. राज्यात माहे मार्च-एप्रिल,२०२३ या कालावधीत पडलेल्या अवेळी पावसामुळे मुख्यत्वे: शेतीपिकांचे नुकसान झाले आहे. अवेळी पाऊस ही राज्य शासनाने घोषित केलेली आपत्ती असून शेतीपिकांचे नुकसान ३३ टक्केपेक्षा जास्त असल्यास जेवढ्या क्षेत्राचे नुकसान झाले आहे, तेवढ्या क्षेत्राकरिता २ हेक्टर मर्यादेत विहित दराने निविष्ठा अनुदान स्वरुपात शेतकऱ्यांना मदत देण्यात येते. राज्यात मार्च, २०२३ या कालावधीत झालेल्या अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपिके व इतर नुकसानीबाबत अनुज्ञेय दराने शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत आवश्यक ते आदेश वर नमूद दि.१० एप्रिल, २०२३ व दि.२१ एप्रिल,२०२३ च्या शासन निर्णयानुसार निर्गमित करण्यात आले आहेत. आता एप्रिल, २०२३ मधील शेतीपिकांच्या

नुकसानीकरिता विभागीय आयुक्त, अमरावती, कोकण, पुणे व औरंगाबाद यांच्याकडून निधी मागणीचे प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. त्यानुसार निधी वितरणास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

एप्रिल, २०२३ या कालावधीत राज्यातील विविध जिल्ह्यात अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपिके नुकसानीसाठी बाधितांना मदत देण्याकरिता राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून वर नमूद अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या दरानुसार शेतीपिके नुकसानीसाठी एकूण **रु.९८०२.२७ लक्ष (अक्षरी रुपये अठ्यानव्व कोटी दोन लक्ष सत्तावीस हजार फक्त)** इतका निधी सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्यानुसार जिल्हानिहाय वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रात लेखाशीर्षनिहाय दर्शविल्याप्रमाणे कार्यासन म-११ यांनी आवश्यकतेनुसार हा निधी वितरित करावा. सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांनी वर नमूद अ.क्र.१ येथे नमूद दि.२४ जानेवारी, २०२३ अन्वये सूचित केल्यानुसार या प्रस्तावाअंतर्गत असलेल्या शेतीपिकांच्या नुकसानीच्या सर्व लाभार्थ्यांची माहिती विहित नमुन्यात तयार करुन ती संगणकीय प्रणालीवर भरावी. ही माहिती भरतांना द्विरूक्ती होणार नाही व राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या निकषांचे पालन होईल याची खात्री करण्यात यावी.

३. वरील निधी खर्च करताना सर्व संबंधित शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२७ मार्च, २०२३ च्या शासन निर्णयान्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून द्यावयाच्या मदतीचे सुधारित दर मंजूर करण्यात आले आहेत. या दराने व निकषानुसार मदत प्रदान करण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. ही मदत देताना केंद्र शासनाने चक्रीवादळ, पूर इत्यादी नैसर्गिक आपत्तीकरिता विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खात्री सर्व संबंधितांनी करावी. तसेच द्विरुक्ती होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्ह्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. या आदेशाव्दारे तसेच यापूर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाव्दारे नैसर्गिक आपत्तीमध्ये शेतकऱ्यांना दिलेला मदतीचा निधी बँकांनी कर्ज खात्यात अथवा अन्यथा वसुलीसाठी वळती करु नये याकरिता जिल्हाधिकारी यांनी सर्व बँकांना आवश्यक त्या सूचना निर्गमित कराव्यात. या सर्व सूचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता

प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्च करण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०५१७१३२४५९१४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FCF7172A73579B34FA622983D8FB647780FBEF1D35A1CA975955EB9193F3F800, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2023.05.18 16:39:52 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
४. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
५. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
६. सर्व विभागीय आयुक्त.
७. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
१२. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१३. वित्तिय सल्लागार व सहसचिव मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१४. कार्यासन अधिकारी (म-११/ब-१), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१५. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१६. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).

शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.७०/म-३,
दि.१७ मे, २०२३ सोबतचे प्रपत्र

**एप्रिल, २०२३ मध्ये अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपिके नुकसानीकरिता वितरित करावयाच्या मदतीच्या निधीचा लेखाशिर्षनिहाय तपशिल**

| अ. क्र. | जिल्हा | शेतकरी संख्या | शेतीपिकांचे बाधित क्षेत्र (२ हे.पर्यंत) | एकुण निधी रु. लाखात<br>२२४५ २४५२ |
|---|---|---|---|---|
| १ | अमरावती | १६८७ | ८८४.७९ | १६१.४६ |
| २ | अकोला | १५३७१ | ९२६८.६८ | १६५५.०८ |
| ३ | यवतमाळ | २०९ | १२०.६८ | १७.६५ |
| ४ | बुलडाणा | ४६३६ | २१७७.७० | ३७६.७४ |
| ५ | वाशिम | ६५८ | ४३९.५८ | ७७.९० |
| **एकुण अमरावती** | | **२२५६१** | **१२८९१.४३** | **२२८८.८३** |
| ६ | पुणे | २००० | ५५२.७४ | ९८.३८ |
| ७ | सातारा | २३९२ | ११४२.६१ | २०५.६९ |
| ८ | सांगली | १२ | ३.७८ | ०.७७ |
| ९ | सोलापूर | ४४८ | २६३.३६ | ५७.९१ |
| १० | कोल्हापूर | २३२७ | ३५३.९७ | ६४.६५ |
| **एकूण पुणे** | | **७१७९** | **२३१६.४६** | **४२७.४०** |
| ११ | औरंगाबाद (छ.संभाजीनगर) | ४४६४९ | १६१४८.३२ | २६९७.४३ |
| १२ | जालना | ७५८७ | ३८०८.९० | ६५८.०४ |
| १३ | परभणी | २३८ | १८२.५४ | ३२.२५ |
| १४ | हिंगोली | २४८२ | ५८७.४४ | ७७.०१ |
| १५ | नांदेड | १८७७५ | १००४८.३९ | १६२४.१३ |
| १६ | बीड | १६२११ | ६८२३.७३ | ११३२.०१ |
| १७ | लातूर | ३१६२ | १४२०.१९ | २५७.०५ |
| १८ | उस्मानाबाद (धाराशिव) | ५९३० | ३५६४.८० | ५६१.०१ |
| **एकुण औरंगाबाद** | | **९९०३४** | **४२५८४.३१** | **७०३८.९३** |
| १९ | रायगड | १५४ | **४७.३६** | **१०.३३** |
| २० | रत्नागिरी | २८९ | **४८.५६** | **१०.९३** |
| २१ | सिंधुदूर्ग | ९१८ | **९१.८९** | **२५.८५** |
| **एकूण कोकण** | | **१३६१** | **१८७.८१** | **४७.११** |
| **एकुण राज्य** | | **१३०१३५** | **५७९८०.०१** | **९८०२.२७** |